**औरंगाबाद वनवृत्तातील अधिनस्त वन विभागातील न्यायालयीन प्रकरणात मा.न्यायालयात शासनाची बाजू मांडण्यासाठी विवक्षीत कामाकरीता शासकीय सेवानिवृत्त अधिकारी श्री.बाळासाहेब लक्ष्मणराव देशमुख यांची सेवा करार पध्दतीने घेण्यास मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन आदेश क्र.एस-३०/१२/२०१२/प्र.क्र.२३३/भाग-२/फ-६**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- २८/०५/२०२४

वाचा:-

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक-२७१५/प्र.क्र.१००/१३, दि.१७.१२.२०१६

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष/७/ले-१/ प्र.क्र.२७ (२२-२३)/२३/२२-२३ दि.१७.०६.२०२२

३. महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र. एस-३०/१२/२०१२/प्र.क्र.२३३/फ-६ दि.१७.०१.२०२३

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष/७ -ले-१/वि.स.प्र.क्र.२७ (२२-२३)/१३१/२३-२४ दि.२६.०३.२०२४

**शासन आदेश:-**

या विभागाच्या अधिपत्याखालील मुख्य वनसंरक्षक (प्रा.),औरंगाबाद वनवृत्तातील अधिनस्त वन विभागातील न्यायालयीन प्रकरणात मा.न्यायालयात शासनाची बाजू मांडण्यासाठी विवक्षीत कामाकरीता शासकीय सेवानिवृत्त अधिकारी श्री. बाळासाहेब लक्ष्मणराव देशमुख यांच्या सेवा सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्रमांक-२७१५/प्र.क्र.१००/१३, दि.१७.१२.२०१६ नुसार करार पध्दतीने माहे जानेवारी २०२३ ते नोव्हेंबर,२०२३ पर्यंत कालावधीकरिता संदर्भ क्र.३ येथील शासन आदेशान्वये घेण्यात आली होती. आता, संदर्भ क्र.४ येथील अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग),महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचकडून श्री. बाळासाहेब लक्ष्मणराव देशमुख यांच्या सेवा पुढे चालू ठेवण्यासाठी मुदतवाढ देणेबाबतचा प्रस्ताव प्राप्त झाला. सदर प्रस्तावानुसार श्री. बाळासाहेब लक्ष्मणराव देशमुख यांच्या सेवा दि. ३०.११.२०२३ नंतर पुढे चालू ठेवण्यासाठी माहे डिसेंबर २०२३ ते ऑक्टोबर २०२४ या ११ महिन्याच्या कालावधीसाठी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

१. उक्त कराराच्या कालावधीत श्री. बाळासाहेब लक्ष्मणराव देशमुख यांना देय असलेले मासिक पारिश्रमिकाची व भत्याची रक्कम संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतूदीप्रमाणे परिगणीत करण्यात यावी.

२. करार कालावधीत करार पध्दतीने विवक्षीत काम पूर्ण करण्याची जबाबदारी श्री. बाळासाहेब लक्ष्मणराव देशमुख यांची राहील या आशयाचे बंधपत्र/हमीपत्र त्यांचेकडून घेण्यात यावे. तसेच सदर बंधपत्रात/हमीपत्रात करार पध्दतीने नियुक्ती देतांना शासनाने उपरोक्त शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटी व शर्ती व विभागाने निश्चित केलेल्या अटी व शर्ती मान्य असल्याबाबतची सुनिश्चिती करावी. तसेच नियमित सेवेत घेता येणार नसल्याबाबत तसेच इतर कोणत्याही हक्काची मागणी करण्यात येणार नाही याचाही उल्लेख करण्यात यावा.

३. श्री. बाळासाहेब लक्ष्मणराव देशमुख (सेवानिवृत्त) यांना देय मासिक परिश्रमिक व भत्यांवर होणारा खर्च हा कार्यालयीन खर्च/आकस्मिक निधी यासाठी उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. करार पध्दतीने नियुक्ती देण्यात आल्यामुळे श्री. बाळासाहेब लक्ष्मणराव देशमुख (सेवानिवृत्त) यांना शासनाच्या कोणत्याही संवर्गात सेवा समावेशनाचे /सामावून घेण्याचे वा नियमित सेवेचे इतर कोणतेही लाभ मिळण्याचा अधिकार/हक्क नसेल.

५. श्री. बाळासाहेब लक्ष्मणराव देशमुख (सेवानिवृत्त) यांच्यावर सोपविलेले कामकाज निश्चित केलेल्या कालावधीत पूर्ण करणे आवश्यक राहील. त्यांच्या कामकाजाबाबत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख),नागपूर यांनी वेळोवेळी आढावा घेऊन कामाचे मुल्यमापन अहवाल शासनास सादर करावा.

६. विशेष परिस्थितीत करार पध्दतीवरील सेवा समाप्त करण्याचे अधिकार सक्षम प्राधिकारी म्हणून शासनास राहतील.

७. करार पध्दतीने नियुक्ती करण्यात आलेली व्यक्ती, सोपविलेली सेवा पार पाडण्याच्या कामात व्यत्यय निर्माण होईल, अशा कोणत्याही व्यावसायिक कामात गुंतलेली नसावी.

८. करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तीने गुंतलेले हितसंबंध (Conflict of interest) जाहीर करणे आवश्यक राहील.

९. करार पध्दतीने नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तींनी त्यांना प्राप्त होणाऱ्या कागदपत्रे/माहिती व आधारसामग्रीबाबत गोपनीयता पाळणे आवश्यक राहील.

१०. श्री. बाळासाहेब लक्ष्मणराव देशमुख (सेवानिवृत्त) यांना कोणत्याही प्रकारचे प्रशासकीय व वित्तीय अधिकार प्रदान करण्यात येऊ नयेत.

११. सेवानिवृत्त अधिकारी यांच्या विरुध्द कोणतीही विभागीय चौकशीची कारवाई चालू किंवा प्रस्तावित नसावी किंवा अशा चौकशी प्रकरणी कोणतीही शिक्षा झालेली नसावी.

उपरोक्त अटी व शर्ती व्यतिरिक्त सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१७.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील सर्व कार्यपध्दती व अटी शर्ती लागू राहतील.

सदर शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग,क्र.संकीर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दि. १७.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्राप्त अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आल असून त्याचा संकेतांक २०२४०५२८१६०७३९६०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

SHYAMSUNDER IRWANT MALGE

Digitally signed by SHYAMSUNDER IRWANT MALGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=ef2c6b857632ff880249d5f92198ae32126a3ed41118ef32c8c38665682a38cd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D0D1C6394AC68524C2C31447373F198531C10C22292066BA4CF4FC2F1928365D, cn=SHYAMSUNDER IRWANT MALGE
Date: 2024.05.28 16:25:37 +05'30'

**( श्या. इ.माळगे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५. सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक.
६. सर्व मुख्य वनसंरक्षक.
७. महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८. महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर
९. फ-६ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२